मंगलाचरण पहिले

भजन - रामकृष्णहरि जय जय रामकृष्णहरि

१ रुप पाहता लोचनी । सुख झालें वो साजणी ||१|| तो हा विठ्ठल बरवा | तो हा माधव बरवा ||धृ|| बहुता सुकृताची जोडी | म्हणुनी विठ्ठलीं आवडी ||३|| सर्व सुखाचे आगर | बापरखुमादेवीवर ||४||

तो हा विठ्ठल बरवा ||धृ||

२ वचन ऐेका कमळापति । माझी रंकाची विनंती ||१|| कर जोडितों कथेकाळीं । २ आपण असावें जवळी ।।धृ।। घेई ऐसी भाक | मागेन जरी कांहीं एक ||३|| तुकयाबंधु म्हणे देवा । शब्द इतुकाचि राखावा ||४|| कर जोडितों कथेकाळी ।।धृ।।.....

3 तुज पाहतां सामोरी । दृष्टी न फिरे माघारी ||१|| माझ्या चित्त तुझ्या पायां। मिठी पडली पंढरीराया ||धृ|| नव्हे सारितां निराळें। लवण मेळवितां जळें ||३|| तुका म्हणे

बळी | जीव दिला पायातळी ||४|| माझ्या चित्ता तुझ्या पायां ।।धृ।।......

४ तुम्ही सनकादिक संत । म्हणविता कृपावंत ||१|| एवढा करा उपकार । देवा सांगा नमस्कार ||धृ|| भाकावी करूणा | विनवा वैकुठींचा राणा ||३|| तुका म्हणे मज आठवा | मूळ लवकरी पाठवा ||४||एवढा करा उपकार ।। धृ।। .....

५ आतां तुम्ही कृपावंत । साधुसंत जिवलग ||१|| गोमटें तें करा माझें । भार ओझें तुम्हांसी ।।धृ।। वंचिलें तें पायापाशीं नाहीं यासी वेगळें ||३|| तुका म्हणे सोडल्या गांठी । दिली मिठी पायांसी ॥१४॥ गोमटे ते करा माझे ।। धृ।।...

६ लेकुराचे हित | वाहे माऊलीचे चित्त ॥१॥ ऐसी कळवळ्याची जाती | करी लाभाविण प्रीति ||धृ|| पोटी भार वाहे | त्याचे सर्वस्वही साहे ॥३॥ तुका म्हणे माझे | तुम्हा संतांवरी ओझे ॥१४॥ ऐसी कळवळ्याची जाती || ५||..

७ करूनि उचित | प्रेम पाली हृदयांत ||१|| आलों दान मागायास । थोर करोनियां आस ||धृ|| चिंतन समयी | सेवा आपुलीच देई ||३|| तुकयाबंधु म्हणे भावा। मज निरवायें देवा ||४|| आलों दान मागायास ।।धृ।।...२२२

८ न धरी उदास। माझी पुरवावी आसः ||१|| ऐका ऐका नारायणा । नाझी परीसा विज्ञापनाः ||धृ| मायबाप बंधुजन | तूंचि सोयरा सज्जन ||३|| तुका म्हणे तुजविरहित। कोण करील माझे हित ||४|| ऐका ऐका नारायणा ||धृ||...

९ गरुडाचे पायी | ठेवी वेळोवेळां डोई ॥१॥ वेगी आणावा तो हरि | मज दीनाते उद्धरी ||धृ|| पाय लक्ष्मीच्या हाती । म्हणोनि घेतों काकुलती ॥३॥ तुका म्हणे शेषा। जागे करा ऋषीकेशा ॥४॥ वेगी आणावा तो हरि |

१० येग येग विठाबाई | माझे पंढरीचे आई ||१|| भीमा आणि चंद्रभागा | तुझ्या चरणीची गंगा ||धृ| इतुक्यांसहित त्वां बा यावे। माझे रंगणी नाचावें ||३|| माझा रंग तुझे गुणी म्हणे रामयाची जनी ||४|| भीमा आणि चंद्रभागा ॥

भजन रामकृष्णहरि जय जय रामकृष्णहरि

## मंगलाचरण दुसरे

११ उंचनीच कांही नेणे भगवंत । तिष्ठे भावभक्ती देखोनियां ||धृ|| दासीपुत्र कण्या विदुराच्या भक्षी । दैत्याघरी रक्षी प्रल्हादासी ||२|| चर्म रंगू लागे रोहिदासा संगे। कबीराचे मागे शेले विणी ||३|| सजन कसाया विकू लागे मांस | माळ्या सावत्यास खुरपूं लागे ||४|| नरहरि सोनारा घडू फुंकू लागे। चोख्यामेळयासंगे ढोरे ओढी ||५|| नामयाची जनी सवे वेची शेणी। धर्मा घरी पाणी वाहे झाडी ||६|| नाम्यासवें जेवी नव्हे संकोचित। ज्ञानियाची भिंत अंगे ओढी ||७|| अर्जुनाचे रथी होय हा सारथी | भक्षी पोहे प्रीती सुदाम्याचे ||८|| गौळियांचे घरी अंगे गाई वळी। द्वारपाळ बळीद्वारी झाला ||१|| येकोबाचे ऋण फेडी हृषीकेशी | अंबऋषीचे सोशी गर्भवास ||१०|| मिराबाईसाठी घेतो विष प्याला। दामाजीचा झाला पाडिवार ||११|| घडी माती वाहे गोऱ्या कुंभाराची। हुंडी त्या मेहत्याची अंगें भरी ||१२|| पुंडलिकासाठी अझूनि तिष्ठत । तुका म्हणे मात धन्य त्याची ||१३|| उंचनीच कांही नेणे भगवंत ।।धृ।।.....

१२ श्रवणे कीर्तने झाले ते पावन। सनकादिक जाण परम भक्त ||१|| झाली ते विश्रांति याचकां सकळां । जीवी जीवनकळा श्रीमूर्तिरया ||धृ|| पादसेवनें अक्रूर झाला ब्रम्हरूपं । प्रत्यक्ष स्वरूप गोविंदाचें ||३|| सख्यपणें अर्जुन नरनारायण। सृष्टी जनार्दन एकरूप ||४|| दास्यत्व निकट हनुमंतें केलें । म्हणोनि देखिले रामचरण ||५|| बळी आणि भीष्म प्रल्हाद नारद। विभिषण वरद चंद्रार्क ||६|| व्यास आणि वसिष्ठ वाल्मिकादिक । आणिक पुंडलिक शिरोमणी ||७|| शुकादिक योगी रंगले श्रीरंगी। परिक्षितीच्या अंगी ठसावलें ||८|| उध्दव यादव आणि ते गोपाळ । गोपीकांचे मेळ ब्रम्हरूप ||९||अनंत भक्तराशी तरले ते वानर ज्ञानदेवा घर चिदानंदी ||१०||झाली ते विश्रांति याचका सकळा ||धृ||……

१३ पवित्र ते कुळ पावन तो देश | जेथे हरिचे दास जन्म घेती ||१|| कर्मधर्म त्यांचा झाला नारायण । त्यांचेनि पावन तिन्ही लोक ||धृ|| वर्ण अभिमाने कोण झाले पावन । ऐसें द्या सांगून मजपाशी ||३|| अंत्यजादि योनी तरल्या हरिभजने । तयांची पुराणें भाट झाली ॥४॥ वैश्य

तुळाधार गोरा तो कुंभार। धागा हा चांभार रोहिदास ||५|| कबीर मोमीन लतिफा मुसलमान। सेना न्हावी जाण विष्णुदास ||६|| कान्होपात्रा खोदु पिंजारी तो दादु । भजनी अभेदु हरिचे पायी ||७|| चोखामेळा बंका जातीचे महार। त्यासी सर्वेश्वर ऐक्य करी || नामयाची जनी कोण तिचा भाव। जेवी पंढरीराव तियेसवे ||९|| मैराळ जनक कोण कुळ त्याचे । महिमान तयाचे काय सांगो ||१०|| यातायातीधर्म नाही विष्णुदासा। निर्णय हा ऐसा वेदशास्त्री||११|| तुका म्हणे तुम्ही विचारावे ग्रंथ । तारिले पतित नेणों किती ॥१२॥ कर्मधर्म त्यांचा झाला नारायण ॥धृ॥.....

१४ बहु उतावीळ भक्तिचिया काजा। होशी केशीराजा मायबापा ||१|| तुझ्या पायी मज झालासे विश्वास। म्हणोनिया आस मोकलिली || धृ || ऋषी मुनी सिद्ध साधक अपार। कळला विचार त्यांसी तुझा ||३|| नाही नाश ते सुख दिलें तयास। झाले जे उदास सर्वभावे ||४|| तुका म्हणे सुख न माये मानसीं । धरिले जीवेंसी पाय तुझे ||५|| तुझ्या पायीं मज झालासे विश्वास ||धृ||......

१५ पुण्यवंत व्हावें । घेतां सज्जनांची नांवें ||१|| नेघे माझी वाचा तुटी। महालाभ फुकासाठीं ।।धृ।। विश्रांतीचा ठाव । पायी संतांचिया भाव ||३|| तुका म्हणे पापे। जाती संतांचिया जपें ||४| नेघे माझी वाचा तुटी ।।धृ।।......

मंगलाचरण तिसरे

१६ सुंदर ते ध्यान उभे विटेवरी। कर कटेवरी ठेवूनियां ॥१॥ तुळसी हार गळा कासे पीतांबर | आवडे निरंतर हेचि ध्यान ||धृ || मकरकुंडले तळपती श्रवणी । कंठी कौस्तुभमणि विराजित ||३|| तुका म्हणे माझे हेचि सर्व सुख । पाहीन श्रीमुख आवडीनें ॥४॥ तुळसीहार गळां कांसे पितांबर ।।धृ।।.....

१७ सदा माझे डोळे जडो तुझे मूर्ती | रखुमाईच्या पती सोयरिया ||१|| गोड तुझे रूप गोड तुझे नाम। देई मज प्रेम सर्वकाळ ||धृ|| विठू माउलीये हाचि वर देई। संचरोनि राही हृदयामाजी ||३|| तुका म्हणे कांही न मागे आणिक ।

तुझे पायी सुख सर्व आहे ||४|| गोड तुझे रूप गोड तुझें नाम || ||...

१८ आवडे हैं रूप गोजिरें सगुण । पाहतां लोचन सुखावले ||१|| आतां दृष्टीपुढे ऐसाचि तूं राहे। जो मी तुज पाहे पांडुरंगा ॥धृ॥ लाचावले मन लागलीसे गोडी। तें जीवें न सोडी ऐसे झाले ||३|| तुका म्हणे आम्ही मागावी लडिवाळी । पुरवावी आळी मायबायें ||४|| आतां दृष्टीपुढे ऐसाचि तूं रहे ||धृ||.....

१९. झणी दृष्टी लागो तुझ्या सगुणपणा | जेणे माझ्या मना बोध केला ||१|| अनंता जन्मीचें विसरलों दुःख | पाहतां तुझें मुख पांडुरंगा ||धृ|| योगियांच्या ध्यानी ध्यातां नातुडसी। तो तूं आम्हापाशी मागे पुढे ||३|| नामा म्हणे जीवें करीन निबलोण । विटेसहीत चरण ओवाळीन ||४|| अनंता जन्मीचें विसरलों दुःख ।।धृ।।.....

२० पाहतां श्रीमुख सुखावले सुख | डोळियांची भूक न वजे माझ्या ||१|| जिव्हे गोड तीन अक्षरांचा रस । अमृत जयास फिके पुढे ||धृ॥ श्रवणाची वाट चोखाळली शुद्ध।

गेले भेदाभेद निवारोनी ||३|| महामळे मन होते जे गादले शुद्ध चोखाळलें स्फटिक जैसे ||४|| तुका म्हणे माझ्या जीवाचे जीवन | विठ्ठल निधान सांपडलें ||५|| जिव्हे गोड तीन अक्षरांचा रस || ..

२१ येणें मुखें तुझे वर्णी गुण नाम। तेचि मज प्रेम देई देवा ||१|| डोळे भरोनियां पाहिन तुझें मुख। तेंचि मज सुख देई देवा ||धृ|| कान भरोनियां ऐकैन तुझी कीर्ती। ते मज विश्रांती देई देवा ||३|| वाहे रंगी टाळी नाचेन उदास। हैं दे हातांस पायां सुख ।।४।। तुका म्हणे माझा सकळ देहभाव। आणिक नको ठाव चिंतूं यासी ||५|| डोळे भरोनियां पाहीन तुझें मुख ||धृ||.....

२२ नको ब्रह्मज्ञान आत्मस्थिती भाव | मी भक्त तू देव ऐसें करी ||१|| दावी रूप मज गोपिकारमणा। ठेवीन चरणावरी माथा ||धृ|| पाहोनि श्रीमुख देईन आलिंगन । जीवें निंबलोण उतरीन ||३|| पुसतां सांगेन हितगुज मातः । बैसोनि एकांत सुखगोष्टी ||४| तुका म्हणे यासी न लावी

उशीर | माझे अभ्यंतर जाणोनियां ॥५॥ दावी रूप मज गोपिकारमणा । ।।धृ।।......

भजन - जय जय विठोबा रखुमाई

काकड आरती अभंग

२३ उठा उठा प्रभात जाहली | चिंता श्रीविठ्ठल माऊली। दीनाजनांची साउली । येई धाउनी स्मरतांचि ॥१॥ पंढरपुरी जे भीमातटी | सुंदर मनोहर गोमटी | दोन्ही कर ठेवोनि कटी। भेटीसाठी तिष्ठतसे ||२|| किरोट कुंडले मंडित । श्रीमुख अति सुंदर शोभत | गळा वैजयंती डुल्लत हार मिरवत तुळशीचा ||३|| सुरेख मूर्ति सगुण सांवळी | कंठी कौस्तुभ एकावळी | केशर उटी परिमळ आगळी| बुक्का भाळी विलसतसे ॥१४॥ पीत पीतांबर कसला कटी। अक्षय वीट चरण तळवटी । सकळ सौंदर्य सुखाची पेटी | हृदयसंपुष्टी आठवा ते ||५|| अति प्रिय आवडे तुळसी बुक्का | तैसीच प्रीति करी भोळ्या भाविकां | नामा पदपंकज पादुका शिरी मस्तकी वंदितसे ||६|| पंढरपुरी जे भीमातटी |

२४ उठा जागे व्हा रे आतां। स्मरण करा पंढरीनाथा। भावे चरणी ठेवा माथा | चुकवा व्यथा जन्माच्या ||१|| धन दारा पुत्र जन | बंधु सोयरे पिशून | सर्व मिथ्या हैं जाणून । शरण रिघा देवासी ||५|| माया विघ्ने भ्रमला खरे | म्हणतां मी माझेनि घरें। है तो संपत्तीचे वारे साचोकारें जाईल ॥| ३|| आयुष्य जात आहे पाहा । काळ जपतसे महा। स्वहिताचा घोर वहा | ध्यानीं रहा श्रीहरिच्या ||४|| संतचरणी भाव धरा | क्षणक्षणा नाम स्मरा | मुक्ति सायुज्यता वरा। हेंचि करा बापांनो ||५|| विष्णुदास विनवी नामा | भुलूं नका भवकामा | धरा अंतरी निजप्रेमा। न चुका नेमा हरिभक्ती ||६|| धन दारा पुत्र जन ||धृ||.....

२५ उठा उठा साधुसंत | साधा आपुलें हित | जाईल हा नरदेह। मग कैचा भगवंत ||१|| उठोनि वेगेसी | चला जाऊं राउळासी |जळती पातकांच्या राशी | काकड आरती देखिलिया ||२|| उठोनियां पहाटे विठ्ठल पहा उभा विटे। चरण तयाचे गोमटे अमृत दृष्टी अवलोका ||३|| जागे करा रूक्मिणीवरा । देव आहे निदसुरा। वेगें निंबलोण

करा । दृष्ट होईल तयासी ||४|| पुढे वाजंत्री वाजती।ढोल दमामे गर्जती | होते काकड आरती | पांडुरंग रायाची ॥ ५॥ सिंहनाद शंख भेरी | गजर होतो महाद्वारी | केशवराज विटेवरी | नामा चरण वंदितो ||६||

उठोनी वेगेसी चला जाऊ राउळासी|....

२६. उठा पांडुरंगा आता दर्शन द्या सकळां । झाला अरूणोदय सरली निद्रेची वेळा||१|| संत साधु मुनी अवघे झालेती गोळा | सोडा सेजसुख आता पाहू द्या मुखकमळा ||धृ|| रंगमंडपी महाद्वारी झालीसे दाटी। मन उतावीळ रूप पाहावया दृष्टी ||३|| राही रखुमाई तुम्हां येऊ द्या दया। सेजे हालउनी जागे करा देवराया ||४|| गरुड़ हनुमंत पुढे पाहाती बाट । स्वर्गींचे सुरवर घेउनी आले बोभाट ||५|| झाले मुक्तद्वार लाभ झाला रोकड़ा। विष्णुदास नामा उभा घेऊनी काकड़ा ||६|| संत साधु मुनी अवघे झालेती गोळा ||धृ।।.....

२७ उठा अरुणोदय प्रकाश जहाला | घंटा गजर गर्जिन्नला। हरि चौघडा सुरु झाला । काकड आरती समयाचा ||१|| महाद्वारी वैष्णवजन। पूजासामुग्री घेऊन ।

आले द्यावे तयासी दर्शन । बंदिजन गर्जती || धृ ||
सभामंडपी कीर्तन घोष | मृदंग टाळ विणे सुरस । आनंदे गाती हरीचे दास | परम उल्हासें करूनियां ||३|| चंद्रभागे वाळवंटी । प्रातः स्नाना जनदाटी |आता येतील आपुले भेटी । उठीं उठीं गोविंदा ||४|| ऐसे विनवी रूक्मिणी | जागृत झालें चक्रपाणि । नामा बद्धां जोडोनी | चरणी माथा ठेवितसे ||५|| महाद्वारी वैष्णवजन । पूजासामुग्री घेऊन ||धृ ||

२८. उठा पांडुरंगा प्रभात समयो पातला | वैष्णवांचा मेळा  गरुड़पारी दाटला||१|| वाळवंटापासूनी महाद्वारापर्यंत | सुरवरांची मांदी उभे जोडोनि हात ||ध्रु|| शुकसनकादिक नारद तुंबर भक्तांच्या कोटी | कवाडा आडोनी पाहताती जगजेठी ||३|| सुरवरांची विमानें गगनी दाटली सकळ । रखुमाबाई माते वेगी उठवा घननीळ ।। ४।। रंभादिक नाचती उभ्या जोडुनि हात। त्रिशूळ डमरू घेऊनि आला गिरिजेचा कांत ||५|| पंचप्राण आरत्या घेऊनिया देवस्त्रिया येती । भावे ओवाळिती राही रखुमाईचा पती ||६|| अनंत अवतार घेसी भक्ताकारणे।

कनवाळू कृपाळू दीनालागी उद्धरणें ||७|| चौ युगांचा भक्त नामा उभा कीर्तनी। पाठीमागे डोळे लाऊन उभी ती जनी ||८|| वाळवंटापासुन महाद्वारापर्यंत || ||

२९ अवघे हरिजन मिळोनी आले राउळा। दोन्ही कर जोड़ोनी विनविती गोपाळा ||१|| उठा पांडुरंगा हरिजना सांभाळी पाहूं द्या  वदन वंदू पायांची धूळी ||धृ|| उगवला दिनकर झाल्या निवळस दिशा | कोठवरी निद्रा आर्ता उठा परेशा ||३|| तुका म्हणे आम्ही उमे तिष्ठत द्वाराशी | दोन्ही कर जोडोनी गाई गोपाळ सेवेसी ||४|| उठा पांडुरंगा हरिजना सांभाळी ।।...

३०. काहो तुम्ही निश्चिंतीने निजलाती हरि | मानियेले सुख आम्ही वाचू कैशापरी ||१|| उठा सावध व्हावे क्षेम सकळासी द्यावे। जया जी वासना तय जैसे पुरवावे ||धृ|| जन्मोजन्मीं सांभाळले क्षमा करा अन्याय | कृपा करी देवा आम्हा तूंचि बापमाय ॥३॥ तुका म्हणे करा वडीलपण दानासी । जेणें सुख होय सकळ हे जनासी || ४|| उठा सावध व्हावे क्षेम सकळासी द्यावे ||धृ||......

३१ उठा सकळजन उठिलें नारायण आनंदले मुनिजन तिन्ही लोक ||१|| करा जयजयकार वाद्यांचे गजर मुदंग अपार टाळघोळ ||धृ|| जोडोनिया कर मुख पहा सादर पायावरी शिर ठेवूनियां ||३|| तुका म्हणे काय पडिये ते ते मागा। आपुलाले सांगा सुख दुःख ||४|| करा जयजयकार वाद्यांचे गजर ||धृ||

सुचना पुढील अभंग म्हणण्या अगोदर काकडा तयार करून घेणे

३२. भक्तिचिया पोटी बोध काकडा ज्योती। पंचप्राण जीवे भावे ओवाळू आरती ||१|| ओवाळू आरती माझ्या पंढरीनाथा | दोन्ही कर जोडोनि चरणी ठेवीतो माथा ।। धृ।। काय महिमा वर्णू आतां सांगणे किती | कोटि ब्रह्महत्या मुख पाहतां जाती ||३|| राही रखुमाई उभ्या दोन्ही दो बाहीं। मयूर पिच्छ चामरें ढाळीती ठायीं ठायीं || ४|| तुका म्हणे दीप घेऊनि उन्मन ती शोभा विटेवरी उभा दिसे लावण्य गामा ||५||ओवाळू आरती माझ्या पंढरीनाथा ||धृ||......

३३ कनकाच्या परियेळी उजळोनी आरती । रत्नदीपप्रभा कैश्या पाजळल्या ज्योती। ओवाळू गे माये सबाह्य साजिरा | राही रखुमाबाई सत्यभामेच्या वरा | मंडीत चतुर्भुज दिव्य कानी कुंडले | श्रीमुखाची शोभा पहाता तेज फाकले ||वैजयंती माळ गळा शोभे श्रीमंत | शंखचक्रगदापद्म आयुध शोभत ||४||  सांवळा सुकुमार जैसा कर्दळी गाभा | चरणीची नेपुरे वांकी गर्जती नभा || ५||||| ओवाळीतां मन है उभे ठाकले ठायी । समदृष्टी समान तुकया लागला पायी ॥६॥

ओवाळू गे माये सबाह्य साजिरा ॥धृ॥.....

३४ तपे तीर्थे व्रते जया पायी मिरवती। संत मुनीवृदे जया सुखासी लाधती ||१|| हरीच्या पायालागी आरती करूं । कायावाचामने चरण दृढ धरु || || सुरासुर उसे नमना कर जोडोनि । प्रल्हाद नारद अखंड जयाचे ध्यानीं ||३|| एकाएकी विनटला जनार्दन पायी | आरती करीता देही देहभाव नाहीं ||४| हरीच्या पायालागी आरती करूं ।। धृ।।.....

३५. संतसनकादिक भक्त मिळाले आणीक | स्वानंदे गर्जती पाहू आले कौतुक ॥१॥ नवल होताहे आरती देवाधिदेवा | स्वर्गीहून सुरवर पाहूं येती केशवा ||६|| नरनारीबाळा टक पडियले नयनां |ओवाळितां श्रीमुख धणी न पुरे मना ||३|| एका जनार्दनी मंगळ आरत्या गाती । मिळाले वैष्णव जयजयकारें गर्जती ||४||नवल होताहे आरती देवाधिदेवा ||धृ||.....

सुचना : पुढील अभंग म्हणतांना काकडा तुळसी वृंदावनाजवळ नेवून सुर्यनारायणाला ओवाळणे

३६ सहस्र दीपें दीप कैसी प्रकाशली प्रभा। उजळल्या दशदिशा गगना आलीसे शोभा ||१|| काकड आरती माझ्या कृष्णा सभागियां चराचर मोहरलें तुझी मूर्ती पहावया ||धृ|| कोंदलेसें तेजप्रभा झालीसे एक। नित्य नवा आनंद ओवाळितां श्रीमुख ||३|| आरती करितां तेज प्रकाशले नयनी तेणे तेजें मिनला एकाएकी जनार्दन ||४|| काकड आरती माझ्या कृष्णा सभागिया ।।धृ।।.....

सुचना पुढील अभंग म्हणतांना प्रत्येकाने स्वतःभोवती प्रदक्षिणा करणे

३७ लाजले गे माये आतां कोणा ओवाळू। जिकडे पाहावे तिकडे चतुर्भुज गोपाळु ।।धृ।। ओवाळू मी गेले माय गेले द्वारके। जिकडे पहावे तिकडे चतुर्भुज सारिखें ||२|| ओवाळू मी गेले माय सखिया माझारी जिकडे पहावे तिकडे चतुर्भुज नरनारी ||३|| ओवाळूं मी गेलें माय सारंगधरा जिकडे पहावे तिकडे चतुर्भुज परिवारा ||४|| वैजयंती माळ गळां श्रीवत्सलांछन विष्णुदास नामा येणें दाविली खूण ||५|| लाजले गे माये आतां कोणा ओवाळू।।धृ।।.....

३८ तुझे दास्य करूं आणिका मागो खावया । धिग झाले जिणे माझे पंढरीराया ||१|| काय गा विठोबा तुज आता म्हणावे | शुभाशुभ गोड तुम्हां थोरांच्या दैवें ||२|| संसाराचा धाक निरंतर आम्हांसी । मरण भले परि काय अवकळा ऐसी ||३|| तुझा शरणागत शरण जाऊं आणिकासी। तुका म्हणे लाज हे कवणा नेणसी ||४|| ३८. काय गा विठोबा तुज आता म्हणावे ॥धृ॥

३९ अवताराच्या राशी तो हा उभा विटेवरी | शंखचक्रगदापद्मसहित करी ||१|| देखिला देखिला देवा

आदि देव बरवा। समाधान जीवा पाहतां वाटे गे माये || धृ || सगुण चतुर्भुज रूपडे तेज पुंजाळती । वंदोनि चरणरज नामा विनवीतसे पुढती ||३|| देखिला देखिला देवा आदि देव बरवा ||

सुचना पुढील अभंग म्हणतांना मंदिरातील सर्व मुर्तींना ओवाळणी करून काकड़ा विणेकरी व सर्व भाविकांना देणे

३९ तुझिये निढळीं कोटि चंद्र प्रकाशे । कमलनयन हास्य वदन हासे ||१|| हाल का रे कृष्णा डोल कां रे । घडिये घडिये घडिये गुज बोल कारे ||धृ || उभा राहोनियां कैसा हालवितो बाहो बापरखुमादेवीवरू विठ्ठल नाहो ||३|| हाल का रे कृष्णा डोल कां रे ।।धृ।।

।। भजन- विठ्ठल विठ्ठल विठ्ठल विठ्ठल ||

भूपाळ्यांचे अभंग

४० योगिया दुर्लभ तो म्यां देखिला साजणी । पाहतां पाहतां मना न पुरे धनी।।१।। देखिला देखिला मायें देवांचा देवो । फिटला संदेहो निमालें दुजेपण ||धृ||

अनंतरूपे अनंत वेषे देखिलें म्यां त्यासी ।
बापरखुमादेवीवरू खूण बाणली कैसी ।।३।। देखिला
देखिला मायें देवांचा देवो ।।धृ।।......

४१ करूनी विनवणी पायी ठेवितो माथा | परिसावी
विनंती माझी पंढरीनाथा ||१|| अखंडित असावेसे वाटते
पायी। साहोनि संकोच ठाव थोडासा देई ||धृ || असो नसो
भाव आलो तुझीया ठाया। कृपादृष्टी पाहे मजकडे
पंढरीराया ||३|| तुका म्हणे तुझी आम्ही वेडी वाकुडीं।
नामें भवपाश हाते आपुल्या तोडी ||४||अखंडित असावेसे
वाटतें पायीं ।।धृ।।......

४२ माझे चित्त तुझे पायीं। राहे ऐसें करी कांहीं। धरोनियां
बाही। भव हा तारी दातारा ||१|| चतुरा तूं शिरोमणि गुण
लावण्याची खाणी । मुगुट सकळां मणि । धन्य तूचि
विठोबा ॥धृ॥ करी या तिमिरांचा नाश। उदयो होऊनि
प्रकाश। तोडी आशापाश । करी वास हृदयी ||३|| पाहे
गुंतलो नेणतां । माझी असो तुम्हां चिंता । तुका ठेवी
माथा। पायीं आतां राखावे ||४|| चतुरा तूं शिरोमणि ||धृ||

४३ ऐसी वाट पाहे कांही निरोप का मूळ | का हो कळवळा तुम्हां उमटेचि ना ||१|| अहो पांडुरंगे पंढरीचे निवासे। लावूनियां आसे चाळवूनि ठेविलें ॥ धृ ॥ काय जन्मा येऊनियां केली म्यां जोडी। ऐसें घडोघडी चित्ता येतें आठवूं ॥३॥ तुका म्हणे खरा न पवेचि विभाग। धिक्कारितें जग हेंचि लाहें हिशोबें ||४||अहो पांडुरंगे पंढरीचे निवासे ।। धृ ।।....

४४ बोलोनियां दाऊं की तुम्ही नेणा जी देवा | ठेवाल ते ठेवा ठायीं तैसा राहेन ||१|| पांगुळले मन कांही नाटये उपाय | म्हणवूनी पाय जीवीं धरूनि राहिलों ॥धृ॥ त्यागे भोगे दुःख काय सांडावे मांडावे । ऐसी धरियेली जीवे माझ्या धीर आशंका ||३|| तुका म्हणे माते बाळ चुकलिया बनीं।न पवता जननी दुःख पावे विठ्ठले ||४|| पांगुळले मन काही नाठवे उपाय ||धृ|

४५ कां गा केविलवाणा केलो दीनाचा दीन। काय तुझी हीन शक्ति झालीसे दिसे ||१|| लाज येते मना तुझा म्हणविता दास गोडी नाही रस बोलिलीया सारिखी ||धृ|| लाजविली मागे संताची ही उत्तरें। कळों येतें खरें दुजे

एकावरूनि ॥३॥ तुका म्हणे माझी कोणी वदविली वाणी प्रसादा वांचूनी तुमचिया विठ्ठला ||४|| लाज येते मना तुझा म्हणविता दास ||धृ||......

४६ जळो माझे कर्म वाया केली कटकट | झाले तैसे तट नाही आलें अनुभवा ||१|| आतां पुढे धीर काय देऊं या मना | ऐसें नारायणा प्रेरिलें तें पाहिजे ||धृ|| गुणवंत केलों दोष जाणायासाठीं | माझें माझें पोटीं बळकट दूषण ||३|| तुका म्हणे अहो केशीराजा दयाळा । बरवा हा ळळा पाळीयेला शेवटी ||४|| आतां पुढे धीर काय देऊं या मना ||

४७ जळोत ती येथे उपजविती अंतराय । सायासाची जोडी माझी तुमचे पाय ||१|| आतां मज साह्य येथे करावे देवा | तुझी घेई सेवा सकळ गोवा उगवूनी || धृ || भोगे रोगा जोडोनियां दिलें आणिकां । अरूचि ते हो कां आता सकळापासून||३|| तुका म्हणे असो तुझे तुझे मस्तकी नाहीं ये लौकिकी आतां मज वर्तणें ||४|| आतां मज साह्य येथें करावे देवा ।।धृ।।......

४८ न सांगतां तुम्हां कळों येतें अंतर | विश्व विश्वंभर परिहारचि न लगे ||१|| परि हे अनावर आवरितां आवडी अवसान ते घडी पुरो एकी देत नाही |||| काय उणे मज येथे ठेविलिये ठायी | पोटा आलों तपासूनियां समर्थ ||३|| तुका म्हणे अवघी आवरिली वासना | आता नारायणा दुसरियांपासुनी ||४|| परि हे अनावर आवरितां आवडी ।। धृ।।......

४९ तुजसवे आम्ही अनुसरलो अबळा । नको अंगी कळा राहो हरि होन देऊं ||१|| सासुरवासा भितो जीव ओढे तुजपाशी। आतां दोहीविशीलज्जा राखे आमुची ॥धु॥ न कळता संग झाला सहज खेळतां । प्रवर्तली चिंता मागिलाची यावरी ||३|| तुका म्हणे असतां जैसे तैसे बरवें । वचन या भाव वेचूनियां बिनटलों ||४|| सासुरवासा भितो जीव ओढे तुजपाशी ।।धृ।।......

५० कामें नेलें चित्त नेदी अवलोकूं मुख । बहु वाटे दुःख फुटों पाहे हृदय ।।१।। कां गा सासुरवासी मज केलें भगवंता । आपुलिया सत्ता स्वाधीनता ते नाहीं ।।धृ।। प्रभातेसी वाटें तुमच्या यावे दर्शना । येथे न चले चोरी

उरली राहे वासना ||३|| येथें अवघे वायां गेलें दिसती सायास । तुका म्हणे नाश दिस झाल्या वैचाचा ||४|| कां गा सासुरवासी मज केलें भगवंता || धृ || ......

५१ आतां कोठे धावें मन । तुझे चरण देखिलिया ||१|| भाग गेला शीण गेला। अवघा झाला आनंदु ||धृ|| प्रेमरसे बैसली मिठी । आवडी लाठी मुखासी ||३|| तुका म्हणे आम्हां जोगें । विठ्ठल घोंगे खरें माप ||४|| भाग गेला शीण गेला ॥धृ॥

॥ भजन - जय जय विठोबा रखुमाई ||

पुजेची ओळ

५२ ज्ञानियांचा गुरू राजा महाराव म्हणती ज्ञानदेव तुम्हां ऐसे ||१|| मज पामरा है काय थोरपण । पायीची वाहाण पाय बरी ॥धृ॥ ब्रह्मादिक जेथे तुम्हा ओळंगणे | इतर तुळणे काय पुढे ||३|| तुका म्हणे नेणें युक्तीची ते खोली। म्हणोनिं ठेविली पायी डोई ||४|| मज पामरा हे काय थोरपण ।।।......

५३ जयाचिये द्वारी सोन्याचा पिंपळ | अंगी ऐसें बळ रेडा बोले ||१|| करील ते काय नोहे महाराज। परि पाहे बीज शुद्ध अंगी ।।धृ।। जयाने घातली मुक्तीची गवांदी। मेळविली मांदी वैष्णवांची ||३|| तुका म्हणे तेथे सुखा काय उणे |राहे समाधानें चित्ताचिया ||४|| करील ते काय नव्हे महाराज ।।धृ।।.....

५४ श्रीपंढरीशा पतित पावना एक विज्ञापना पायांपाशी ||१|| अनाथा जीवांचा तूं काज कैवारी ऐसी चराचरी ब्रीदाबळी ||धृ|| न सांगतां कहें अंतरीचे गुज। आतां तुझी लाज तुज देवां ||३|| आळिकर त्याचें करिसी समाधान । अभयाचे दान देऊनिया ||४|| तुका म्हणे तूंची खेळे दोन्ही ठाई | नसेल तो देई धीर मना ||५|| अनाथा जीवांचा तूं काज कैवारी ॥धृ॥

५५ अगा ये उदारा अगा विश्वंभरा रखुमाईच्या वरा पांडुरंगा ||१|| अगा सर्वोत्तमा अगा कृष्णा रामा । अगा मेघः श्यामा विश्वजनित्या ||धृ|| अगा कृपावंता जीवन तूं दाता । अगा सर्व सत्ता धरतिया ||३|| अगा सर्व जाणा अगा नारायणा । करुणावचना चित्त द्यावें ||४|| तुका म्हणे

नाही अधिकार तैसी। सरती पायांपाशी केली मागे ||५||
अगा सर्वोत्तमा अगा कृष्णा रामा ||धृ||.....

५६ नोहे दास खरा । परि हा झालासे डांगोरा ||१|| यासी काय करूं आतां । तूं सकळ जाणतां । नाहीं पुण्य गांठी जें हें वेचू कोणासाठी ||३|| तुका म्हणे कां उपाधि वाढविली कृपानिधी ||४|| यासी काय करूं आतां ।। धृ।।......

५७ शंखचक्रगदाधरु। कासे सुरंग पितांबरू | चरणी ब्रीदाचा तोडरु |असुरावरी काढितसे ||१|| बरवा बरवा केशवराज | गरूडवाहन चतुर्भुज। कंठी कौस्तुभ झळके बीज | मेघश्याम देखोनि ||धृ|| करी सृष्टीची रचना । नाभी जन्म चतुराननना। जग हे वाखाणी मदना ते लेकरू तयाचे ||३|| कमळा विलासली पायी आर्त तुळसीचे ठायीं । ब्रह्मादिका अवसरू नाही | तो येशोदे वोसंगा ||४|| उपमा द्यावी कवणे अंगा। चरणी जन्मली पै गंगा | सोळा सहस्र रमा संभोगा । नित्य न पुरती कामिनी ||५|| आधिष्ठान गोदातीरी। ऋद्धिसिद्धि तिष्ठती द्वारी । भानुदास पूजा

करी । वाक् पुष्पें अनुपम्य ||६|| बरवा घरवा केशवराज ||||

५८ समर्पिली वाणी । पांडुरंगी घेते धणी ।।१।। पूजा होती मुक्ताफळी । रस ओवीया मंगळी |||| धार अखंडित । ओघ चालियेला नित्य ||३|| पूर्णाहुति जीव। तुका घेऊनि ठेला भाव ||४|| पुजा होती मुक्ताफळी ।। ६ । .....

५९ येथुनियां ठाव । अवघे लक्षावाचे भाव ||१|| उंच देवाचे चरण । तेथे झाले अधिष्ठान ।।धृ।। आघातावेगळा असे ठाव हा निराळा ||३|| तुका म्हणे स्थळ |धरून राहिलों अचळ ||४|| उंच देवाचे चरण । तेथें झालें अधिष्ठान || धृ ||

६० स्वामीचे हे देणें । येथें पावलो दर्शने ||१|| करू आवडीनें वाद तुमच्या सुखाचा संवाद ।।धृ।। कळावया वर्म हा तो पायाचाचि धर्म ||३|| तुका म्हण सिद्धी हेचि पावविली बुद्धी ||४|| करु आवडीने वाद ।।धृ।।..

६१ कासयानें पूजा करूं केशीराजा। हाचि संदेह माझा फेडीं आतां ।।धृ।। उदके न्हाणू तरी स्वरूप तें तुझें । तेथे काय माझें वेंचे देवा ||२|| गंधाचा सुगंध पुष्पांचा परिमळ

। तेथे मी दुर्बळ काय करूं ||३|| फळदाता तूंच तांबोल अक्षता। तेथे काय आतां वाहों तुज ||४|| वाहूं दक्षिणा तरी धातु नारायण । ब्रह्म तेंचि अन्न दुजे कायी ||५|| गाता तूं ॐकार टाळी नादेश्वर । नाचावया थार नाहीं कोठें ||६|| तुका म्हणे मज अवघे तुझें नाम | धूप दीप रामकृष्ण हरि ||७|| कासवानें पूजा करूं केशीराजा ।। धृ ।।.....

६२ ज्याची खरी सेवा | त्याच्या भय काय जीवा ॥१॥ करितां स्वामीसवे वाद। अधिक अधिक आनंद ||धृ|| असावा तो धर्म मग साहों जाते वर्म ||३||वदे वाग्देवी तुका विठ्ठली गौरवी ||४|| करितां स्वामीसवे वाद ।।धृ।।......

६३ आम्हां हरीच्या दासा कांहीं | भय नाहीं त्र्यैलोकीं ||१|| देव उभा मागे पुढें उगवी कोई संकट ||धृ|| जैसा केला तैसा होय। धांवे सोय धरोनी ||३|| तुका म्हणे अस सुखे गाऊं मुखें विठोबा ||४|| देव उभा मागे पुढें ।। धृ ।।.....

६४ सेवा ते आवडी उच्चारावें नाम। भेदाभेद काम निवारोनि ||१|| नलगे हालावें चालावें बाहेरी । अवघेंचि घरी बैसलिया ||धृ|| देवाचींच नाम देवाचिये शिरी। सर्व अळंकारी समर्पावी ||३|| तुका म्हणे होय भावेंचि संतोषी |

वसे नामापाशी आपुलिया ||४|| नलगे हालावे चालायें बाहेरी ।।धृ।।....

६५ नाम गाऊं नाम ध्याऊं । नाम विठोबासी वाहूं ।।१।। आम्ही दैवाचे दैवाचे । दास पंढरीरायाचे ||धृ|| टाळ दिंडी घेऊनि हातीं । विठ्ठल नामगाऊं प्रीति ॥ ३ नामा म्हणे लाखोली सदा | अनंत नामें वाहू गोविंदा ||४|| आम्ही दैवाचे दैवांचे ।।धृ।।......

६६ अवघ्या उपचारा । एक मनचि दातारा ||१|| घ्यावी घ्यावी माझी सेवा। दीन दुर्बळाची देवा ||धृ|| अवघियाचा ठाव पायांवरी जीव भाव ||३|| चित्ताचें आसन । तुका करितों कीर्तन ||४|| घ्यावी घ्यावी माझी सेवा ॥धृ॥

॥ भजन जय जय विठोबा रखुमाई ||

भुपाळ्या

६७ चित्ती तुझे पाय डोळा रूपाचें ध्यान | अखंड मुखी नाम तुमचे वर्णावि गुण || १|| हेंचि एक तुम्हां देवा मागणे

दातारा । उचित तें करा  माझा भाव जाणोनि ||धृ ||
खुंटली जाणीव माझे बोलणे आता । कळों यावी तैसी करा बाळाची चिंता ||३|| तुका म्हणे आता नको देऊ अंतर न कळे पुढे काय बोलू विचार ||४||हेचि एक तुम्हां देवा मागणे दातारा ॥धृ॥......

६८ वाट पाहें चाहे निढळी ठेवूनियां हात | पंढरीचे वाटे दृष्टी लागलेसें चित्त ||१|| कई येता देखेन माझा मायबाप | घटिका बोटे दिवस लेखी धरोनिया माप ॥धृ॥ डावा डोळा तवे उजवी स्फुरतसे बाहे। मन उतावीळ भाव सांडोनिया देहे ||३|| मुख शेज गोड चित्तीं नलगे आणिक । नाठवे परदार तहान पळाली भूक ॥४॥ तुका म्हणे धन्य ऐसा दिवस तो कोण | पंढरीचे वाटे येता मूळ देखेन ||५|| कई येता देखेन माझा मायबाप ||धृ

६९ पडले दुर देशी मज आठवे मानसी | नको नको हा वियोग कष्ट होताती जीवासी ||१|| दिन तैसी रजनी झाली गे माये। अवस्था लाऊन गेला अझूनि कां न ये ।।धृ।। गरुडवाहना गंभीरा येई गा दातारा । बापरखुमादेवीवर श्रीविठ्ठला ||३||दिन तैसी रजनी झाली गे माये ||धृ||.....

७०येतियासी पुसे जातिया धाडी निरोप | पंढरपुरी आहे माझा मायबाप ||१|| पेई वो येई वो विठाबाई माऊली ये । निढळावरी कर ठेवूनि वाट मी पाहे ॥धृ॥ पिवळा पितांबर गगनी झळकला। गरुडावरी बैसोनि माझा कैवारी आला ||३|| विठोबाचे राज्य आम्हा नित्य दिवाळी विष्णूदास नामा जीवेभावे ओवाळी ||४||येई वो येई वो विठाबाई माऊली ये || धृ ||

७१ धन्य आजि दिन झाले संताचे दर्शन ||१|| झाली पापा तापा तुटी । दैन्य गेले उठावठी ।।धृ।। झाले समाधान पायी विसावले मन ||३|| तुका म्हणे आले घरा । तोचि दिवाळी दसरा ||४|| झाली पापा तापा तुटी ।।धृ।।........

७२ पंढरीसी जावे ऐसे माझे मनी |विठाई जननी भेटे केव्हां ॥१॥ नलगे त्या सुखाचा सोहळा | लागें मज ज्वाळा अग्निचिया ।।धृ।। तुका म्हणे त्याचे पाहिलिया पाय। मग दुःख जाय सर्व माझे ||३|| नलगे त्यांविण सुखाचा सोहळा ||६||

७३ संपदा सोहळा नावडे मनाला । करिते टकळा पंढरीचा ||१|| जावें पंढरीसी आवडे मानसी | कधी

एकादशी आषाढी हे||धृ|| तुका म्हणे ऐसे आर्त ज्याचे। मनी त्याची चक्रपाणी वाट पाहे ||३|| जावें पंढरीसी आवडे मनासी ||धृ||.....

७४ आर्त माझे पोटी दिवस लेखी बोटी। प्राण धरोनि कंठी वाट पाहे ||१|| भेटसी केधवा माझिया जिवलगा येईगा पांडुरंगा मायबापा ॥धु॥ चित्त निरंतर माझें महाद्वारी अखंड पंढरी हृदयी वसे ||३|| कटी कर विटे समचरण साजिरें। देखावया झुरे मन माझें ॥४॥ श्रीमुख साजिरे कुंडले गोमटी |तेथे माझी दृष्टी  बैसलीसे ||५|| आसुवे दाटली उभारूनी बाहें। नामा वाट पाहे रात्रंदिवस ||६|| भेटसी केधवा माझिया जिवलगा ॥धृ॥..... ।।

भजन जय जय विठोबा रखुमाई ।। -

टिप यानंतर मुका,बहिरा,वासुदेव,जोगी,आंधळे, पांगुळ,गौळणी,वाराचे अभंग,नाट| इ.